**तत्काळ/कालमर्यादा**

**राज्यातील फरार बंदी/फरार आरोपी यांना फेर अटक करण्यासाठी सर्व पोलीस ठाण्यामध्ये पोलीस अधिकारी व कर्मचारी असा एक विशेष कक्ष स्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन परिपत्रक क्र.सीआरटी ४०३/प्र.क्र.३६४/पोल-११,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ९ नोव्हेंबर, २०१०

वाचा:-१) शासन परिपत्रक क्र.सीआरटी ४०३/प्र.क्र.३६४/पोल-११, दिनांक २२.१०.२०१०

**परिपत्रक**

शासनाचे समक्रमांकाचे दिनांक २२.१०.२०१० रोजीच्या परिपत्रकान्वये मा.उच्च न्यायालयात दाखल असलेल्या याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार सर्न पोलीस घटक प्रमुखांनी आपआपल्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या प्रत्येक पोलीस स्टेशनमध्ये फरार आरोपी व फरार बंदी यांना अटक करण्यासाठी एक विशेष कक्ष तत्काळ स्थापन करण्याबाबतच्या सूचना निर्गमित करण्यात आलेल्या होत्या.

२. फरार आरोपी व फरार बंदी यांना फेर अटक करण्याच्या अनुषंगाने प्रत्येक पोलीस स्टेशनमध्ये एक विशेष कक्ष स्थापून सदर विशेष पोलीस पथकामध्ये नियुक्त केलेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना या व्यतिरिक्त दुसरे काम देण्यात येऊ नये, असेही उपरोक्त संदर्भाधीन परिपत्रकान्वये निर्देशित करण्यात आले आहे.

३. वरील परिपत्रकातील आदेशाची अंमलबजावणी सर्व पोलीस घटक प्रमुखांनी पूर्ण करुन कार्यपूर्ततेचा अहवाल दिनांक १० नोव्हेंबर, २०१० पूर्वी शासनास सादर करण्याबाबत निर्देशित करण्यात आले होते. परंतु शासनाच्या असे निर्दशनास आले आहे की, याबाबत अद्यापही कार्यपूर्तता झालेली नाही. मा.उच्च न्यायालयात या प्रकरणी दिनांक २३ नोव्हेंबर, २०१० रोजी सुनावणीचेवेळी प्रत्येक पोलीस घटकाचा अहवाल न्यायालयासमोर सादर

करावयाचा आहे. सबब, पुन्हा एकदा या परिपत्रकान्वये निर्देशित करण्यात येते की, दिनांक २२.१०.२०१० रोजी निर्गमित केलेल्या शासन परिपत्रकामधील आदेशाची अंमलबजावणी आपण केली नसल्यास ती तत्काळ करुन कार्यपूर्ततेचा अहवाल दिनांक १५ नोव्हेंबर, २०१० पूर्वी शासनास सादर करावा.

४. ज्या घटकांचे पूर्तता अहवाल प्राप्त होणार नाहीत त्या बद्दलची माहिती ही मा.उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणून देण्यात येतील, याची कृपया नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नं.म.शिंदे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक
प्रधान सचिव (विशेष) गृह यांचे स्वीय सहायक
मा.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य.
अपर पोलीस महासंचालक (गुन्हा अन्वेषण विभाग), पुणे.
सर्व पोलीस आयुक्त.
सर्व पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्र)
सर्व पोलीस जिल्हा प्रमुख.